**उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभागाच्या अधिनस्त असलेल्या बाष्पके संचालनालयातील “लघुलेखक (निम्नश्रेणी)” या संवर्गास सामान्य प्रशासन विभागाच्या अधिसूचनेतील सेवाप्रवेश नियमांच्या तरतुदी लागू करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बाष्पके-०५२५/ प्र.क्र ६१/ कामगार -१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम काम मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०३ जून, २०२५

**संदर्भ** :- १. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र. एससी १५९३/३६१९/१४-अ, दिनांक ३१/०७/१९९७.
२. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र. सेप्रनि १५०७/प्र.क्र.१३४/०७/१४-अ, दिनांक १९/११/२००८.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र. एससी १५९३/३६१९/१४-अ, दिनांक ३१/०७/१९९७ व क्रमांक सेप्रनि १५०७/प्र.क्र.१३४/०७/१४-अ, दिनांक १९/११/२००८ अन्वये बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील लघुलेखक (उच्चश्रेणी), लघुलेखक (निम्नश्रेणी) व लघुटंकलेखक या पदांच्या सेवाप्रवेशाचे विनियमन करण्यात येते.

२. सबब, उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभागाच्या अधिनस्त बाष्पके संचालनालयातील “लघुलेखक (निम्नश्रेणी)” या संवर्गास सामान्य प्रशासन विभागाच्या उक्त अधिसूचनेतील सेवाप्रवेश नियमांच्या तरतुदी लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

सामान्य प्रशासन विभागाच्या उक्त दि.३१/७/१९९७ व दि.१९/११/२००८ च्या अधिसूचनेव्दारे प्रसिध्द केलेले लघुलेखक (निम्नश्रेणी) या पदांचे सेवाप्रवेश नियम व सेवाशर्ती या विभागाच्या अधिनस्त असलेल्या बाष्पके संचालनालयातील “लघुलेखक (निम्नश्रेणी)” या संवर्गास लागू करण्यास या शासन निर्णयाव्दारे मान्यता देण्यात आहे.

३. तसेच, सामान्य प्रशासन विभागांतर्गत उपरोक्त सेवाप्रवेश नियम व सेवाशर्ती यामध्ये वेळोवेळी होणारे बदल प्रस्तुत बाष्पके संचालनालयातील “लघुलेखक (निम्नश्रेणी)” या संवर्गासाठी लागू होतील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२५०६०३१६३७५०३४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BABASAHEB SITARAM SHINDE

Digitally signed by BABASAHEB SITARAM SHINDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT,
2.5.4.20=1706e7b903eb05a5f1c405f3795499452af658b876e10b223a0cef893b6b6689, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CC0323A0A674CB4C457CBB6B2C0F8B750E0EE28B3CABD66F127CF1EF467412AE, cn=BABASAHEB SITARAM SHINDE
Date: 2025.06.03 16:38:25 +05'30'

**(बा.सि.शिंदे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

संचालक, बाष्पके संचालनालय, मुंबई

**प्रत -**

१. अपर मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई-२१. (पत्राने)
४. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
५. मा.राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
६. प्रधान सचिव (उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग) यांचे स्वीस सहायक, मंत्रालय, मुंबई-३२
७. उप सचिव (साप्रवि/का.१२),सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. निवडनस्ती : काम-१